**रेशीम संचालनालयाच्या आस्थापनेवरील सहायक संचालक, गट-अ या पदावरून उप संचालक, गट-अ या पदावर तात्पुरती पदोन्नती देणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**शासन आदेश क्र. सपववि-४००२५/२/२०२३ - DESK SERICULTURE-CMTD**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक:- ०१ जून, २०२३

**शासन आदेश :-**

रेशीम संचालनालयाच्या आस्थापनेवरील खालील सहायक संचालक, गट-अ (वेतनस्तर एस-१७, ₹४७६००-१५११००) यांना उप संचालक, गट-अ (वेतनस्तर एस-२१ ₹५७१००-१८०८००) या पदावर या आदेशाद्वारे विहित अटीच्या अधीनतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच सदर सहायक संचालक, गट-अ यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | जात प्रवर्ग | सध्या कार्यरत असलेले कार्यालय | पदोन्नतीनंतर पदस्थापना द्यावयाचे कार्यालय |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १. | श्री.महेंद्र भिमराव ढवळे | अ.जा. | रेशीम संचालनालय, नागपूर | रेशीम संचालनालय, नागपूर |

२. वरील अधिकाऱ्याना खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे:-

(१) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नती कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६-ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच, दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णय प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून सहमती देण्यात येत आहे.

(२) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

३. सदर पदोन्नत अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीचे / नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे ते विहित मुदतीत

नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत तर त्यांना पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरून शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का-१२, दि.१२.०९.२०१६ मधील तरतूदीनुसार शासन स्तरावरून त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

४. संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांना कळविण्यात येते की, वरील पदोन्नत अधिकारी यांना नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी त्यांचा कार्यभार अन्य अधिकाऱ्याकडे सोपवून त्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे तसेच, सदर अधिकारी ज्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरीत अवगत करावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०११३४८०७१००२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by SHRIKRISHNA BABURAO PAWAR
Date: 2023.06.01 13:48:46 +05'30'

**( श्रीकृष्ण पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
२. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक
३. संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, प्रशासकीय इमारत क्र.२, ६ वा माळा, आयुक्त कार्यालय, परिसर, नागपूर ४४० ००१
४. प्रधान महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
७. संबंधित अधिकारी (रेशीम संचालनालय, नागपूर यांचे मार्फत)
८. निवडनस्ती (रेशीम कक्ष).